**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-०९ अंतर्गत परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांना जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन आदेश क्रमांकः सीपीटीपी -२०२४/प्र.क्र.५०/ई-९

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १५ मार्च, २०२४.

**वाचा :-**

१. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.१.२०१४
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-१११४/प्र.क्र.८३/१४/१८-ब, दि.३.११.२०१४
३. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग,क्र.टिआरएन-०२१६/प्र.क्र.५८/सीपीटीपी, दि.०४.०१.२०१७
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-०५१७/प्र.क्र.३६/सीपीटीपी, दि.२१.०७.२०१७
५. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी,दि.२५.०९.२०१९
६. सामान्य प्रशासन विभाग पत्र क्र. टिआरएन-०६२२/प्र.क्र.३८/सीपीटीपी-ब, दि.०१.०८.२०२२
७.संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था,नागपूर यांचे पत्र क्र.आस्था-३२४/सीपीटीपी/उन्नती/८७६, दि.०१.०३.२०२४.

**आदेश :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षा-२०२० अन्वये या पूर्वी मुदतवाढ देण्यात आलेले व नलक्षवादी हल्यात शहीद झालेल्या पोलीस कर्मचाऱ्यांचे पाल्य / वारस या उमेदवारांना गट- ब संवर्गातील परिविक्षाधीन नायब तहसिलदार यांचे एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ अंतर्गत विविध विभागांतर्गत जिल्हा संलग्नता या टप्याचे खातेनिहाय प्रशिक्षण दि.२०.०३.२०२४ पासून सुरू होणार आहे. शासनाने निश्चित केलेल्या प्रशिक्षण कार्यक्रमानुसार एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ अंतर्गत खालील नमूद परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांना प्रशिक्षणासाठी जिल्हा संलग्नतेच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे जिल्हा वाटप करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांचे नांव | प्रशिक्षणासाठी वाटप करण्यात आलेला जिल्हा |
|---|---|---|
| १ | श्रीम. लिना किशोर बोबाटे | चंद्रपूर |
| २ | श्री. नरेंद्र सिताराम हलामी | यवतमाळ |
| ३ | श्रीम. सविता शाहूदास मडावी | चंद्रपूर |
| ४ | श्री. शिरीषकुमार बापुसो शहापुरे | सिंधुदुर्ग |
| ५ | श्रीम. स्नेहल अंकुश वेताळ | पुणे |

२.	जिल्हा संलग्नता या टप्प्याअंतर्गत उपरोक्त परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांना विभागीय प्रशिक्षण पूर्ण करण्यासंदर्भातील सर्वसाधारण मार्गदर्शक सूचना खालीलप्रमाणे आहेत :-

१. उपरोक्त परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांच्या खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण व स्वतंत्र कार्यभार प्रशिक्षण कार्यक्रमासंदर्भात पुस्तिका प्रसिद्ध करण्यात आली आहे. त्यानुसार संबंधित जिल्हाधिकारी यांनी परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांचा दि.२०.०३.२०२४ पासून प्रशिक्षण कार्यक्रम तात्काळ तयार करावा व त्याची प्रत परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांना उपलब्ध करुन द्यावी.

२. परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांनी दैनंदिन रोजनिशी दररोज न चुकता ई-मेलद्वारे संबंधित जिल्हाधिकारी व संपर्क / समन्वय अधिकारी, उपायुक्त (महसूल) यांना सादर करावी.

३. विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांनी प्रशिक्षणार्थीवर प्रत्यक्ष नियंत्रण ठेवावे तसेच, प्रशिक्षणार्थींनी केलेल्या कामकाजाचे मूल्यमापन व अनुभवाच्या आधारावर मासिक अहवाल घ्यावा व सदर अहवालाचे  मूल्यमापन करावे. तसेच, प्रत्येक महिन्यास त्याचा अहवाल प्रमाणित करून सामान्य प्रशासन विभागास पाठवावा.

४. परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांच्या दैनंदिन उपस्थिती / अनुपस्थिती / वर्तन इ. बाबत संबंधित जिल्हाधिकारी यांनी विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांना अहवाल सादर करावा.

५. प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षणार्थीने गैरवर्तन केल्याचे अथवा प्रशिक्षण पुरेशा गांभीर्याने घेत नसल्याचे निदर्शनास आल्यास अशा घटना त्वरीत संबंधित जिल्हाधिकारी यांनी संपर्क समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांच्याशी संपर्क साधून निदर्शनास आणून देण्यात याव्यात. तसेच गैरवर्तनाची नोंद संबंधितांच्या वैयक्तिक सेवा अभिलेखात नोंदवाव्यात. तसेच या संबंधित अहवाल समन्वय अधिकारी / विभागाचे नोडल अधिकारी / प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी व सामान्य प्रशासन विभागास सादर करावा.

६. सर्व जिल्हाधिकारी यांनी खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाच्या टप्प्यासाठी हजर झालेल्या परिविक्षाधीन अधिका-यांची सेवापुस्तके तयार करावीत व नियुक्तीप्राप्त उमेदवाररांचे सेवार्थ आयडी आणि डीसीपीएस संदर्भात कार्यवाही करून त्यांना नियमित वेतन प्रदान करण्यात यावे.

७. खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण कालावधीत प्रशिक्षण कार्यक्रमांतर्गत घेण्यात येणा-या परीक्षा प्रशिक्षणार्थींनी विहित मुदतीत उत्तीर्ण होणे आवश्यक आहे. तसेच, प्रशिक्षण  कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी  सामान्य प्रशासन विभागामार्फत वेळोवेळी  निर्गमित केलेल्या मागदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाच्या टप्प्यामध्ये परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांचे मुल्यमापन करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टीआरएन-२०१६/प्र.क्र.५८/सीपीटीपी, दि.०४.०१.२०१७ मधील निर्देशानुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी विभागाचे नोडल अधिकारी व प्रशिक्षण संस्थांचे संपर्क अधिकारी यांची राहील.

९. विभागातील संपर्क/समन्वय अधिकारी म्हणून उपायुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय, यांना घोषित करण्यात आले आहे. त्यानुसार संपर्क/समन्वय अधिकारी उपायुक्त (महसूल) यांनी प्रशिक्षण कार्यक्रम यशस्वीपणे पार पाडण्यासाठी योग्य ती दक्षता घ्यावी.

१०.उपरोक्त परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांना केवळ खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण कार्यक्रमासाठीच जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

११.परिवीक्षाधीन नायब तहसीलदार यांनी त्यांना प्रक्षिणासाठी वाटप केलेल्या जिल्हयात दि. २०.०३.२०२४ रोजी पासून संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडे रुजू व्हावे. परिविक्षाधीन नायब तहसिलदार यांना रूजू करून घेवून तसा अनुपालन अहवाल वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर व शासनास तात्काळ सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१६१२४९५३४४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKANT
MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.03.16 12:59:37 +05'30'

**(श्रीकांत म. मोहिते)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त,कोकण/पुणे/अमरावती/नागपूर

२) सर्व संबंधित जिल्हाधिकारी

**प्रत :**

१.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राद्वारे)

२.महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी राजभवन आवार (यशदा), बाणेर रोड, पुणे

३. प्रधान महालेखापाल नागपूर/ मुंबई (लेखाअनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)

४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर

५. उप सचिव (सीपीटीपी), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई

६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी

७. संबंधित प्रशिक्षणार्थी.

८. कार्यासन ई -८ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई

९. कार्यासन ई-९ निवड नस्ती, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.